जळगांव येथे १५० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ६५० खाटांचे रुग्णालय, व अनुषंगिक बांधकामांच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

शासन निर्णय क्रमांक : जीसीजे -२०२३/प्र.क्र.१९/प्रशा-१
गो.ते.रुग्णालय आवार,नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०३ मार्च,२०२३

**वाचा** : शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक जीसीजे-२०१७/प्र.क्र.३२६/प्रशा-१, दिनांक १०.०५.२०१८ व दि.०२.०७.२०१८

**प्रस्तावना :**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव संस्थेच्या १०० विद्यार्थी क्षमता व ५०० खाटांचे रुग्णालय इत्यादी इमारतींच्या बांधकामासाठी रुपये ४५८.८५ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर बांधकामासाठी मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय, दिनांक ०८.०२.२०१८ मधील तरतूदीनुसार मा. अ.मु.स. (वित्त ) यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या मान्यतेने जळगांव संस्थेच्या बांधकामासाठी मे.एच.एस.सी.सी. (इंडिया) प्रा.लि. यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. त्यानुसार याविषयी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागारासोबत दिनांक ११/०९/२०१९ रोजी सामंजस्य करार करण्यात आलेला आहे.

दरम्यानच्या काळात शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव संस्थेची प्रवेश क्षमता ५० ने वाढल्याने सदर संस्थेची प्रवेश क्षमता १०० विद्यार्थी क्षमतेवरून १५० विद्यार्थी क्षमता अशी झाली आहे. त्यानुषंगाने रुग्णखाटांची संख्येतही वाढ झालेली आहे. प्रस्तुत विषयी जळगांव शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाच्या विद्यार्थी प्रवेश संख्येत झालेल्या वाढीच्या अनुषंगाने सुधारित कामाच्या व्याप्तीसह सदर संस्थेच्या बांधकामाच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २६.०२.२०२३ रोजी आयोजित बैठकीतील निर्णयानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केलेल्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अनुषंगाने,

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव संस्थेच्या बांधकामासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दिलेली प्रशासकीय मान्यता सुधारित करून, १५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे वैद्यकीय महाविद्यालय, ६५० खाटांचे संलग्नित रुग्णालय व अनुषंगिक इमारतीच्या बांधकामासाठीच्या रुपये ७११,१७,५६,०००/- ( रुपये सातशे अकरा कोटी सतरा लक्ष छप्पन्न हजार फक्त ) इतक्या किंमतीच्या सुधारित बांधकाम अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम (रूपयांमध्ये |
|---|---|---|
| १) | जळगांव येथे १५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय , ६५० खाटांचे रुग्णालय व अनुषंगिक इमारतीचे बांधकाम करणे | ७११,१७,५६,००० |

**अटी व शर्ती :-**

१) सदर बांधकाम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काची पूर्तता करण्यात यावी.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग ,शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दि.१०जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.
५) इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.
६) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर बांधकामासाठी मे.एच.एस.सी.सी. (इंडिया) प्रा.लि. यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार म्हणून नेमणूक करण्यात आलेली आहे. प्रस्तुत विषयी वाढीव विद्यार्थी क्षमता, रुग्णखाटा इत्यादीमुळे जळगांव संस्थेच्या बांधकामाच्या व्याप्तीमध्ये व अंदाजपत्रकीय किंमतीत बदल झालेला आहे. याबाबत मूळ कामासाठी निवड करण्यात आलेल्या प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांनी सदर अंदाजपत्रकास प्राप्त झालेल्या तांत्रिक मान्यतेच्या आधारावर विहित कार्यपध्दतीने राबविण्यात

आलेल्या निविदा प्रक्रियेस मान्यता प्रदान करण्यास मा. मंत्रिमंडळाने दि.२६.०२.२०२३ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे.

३. सदर बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात येईल.

| मागणी क्रमांक एस -०४ | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकीत्सा-राज्य योजनांत्गत योजना |
| (००) (५३) | - | शासकीय वैद्यकीय/दंत/आयुर्वेद महाविद्यालयाचे व रूग्णालयांची विनिर्दिष्टीत कामे केंद्र शासनाच्या अधिपत्याखालील सार्वजनिक उपक्रम असलेल्या कंपनीकडून व तत्सम कंपनीकडून टर्न की तत्वावर करून घेणेबाबत (४२१० २६२५) |
| ५३ | - | मोठी बांधकामे |

४. सदर शासन निर्णय दिनांक २६.०२.२०२३ रोजी पार पडलेल्या मा.मंत्रीमंडळ बैठकीत प्राप्त मान्यता व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील तरतूदीनुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०२३०३०३१३१९५६६२१३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2023.03.08 17:55:03 +05'30'

**(प्रकाश सुरवसे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य

२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर

३) अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

५) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय , मुंबई

६) प्रधान सचिव तथा विधि परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

७) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

८) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई

९) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई

१०) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव

११) व्यवस्थापक, एच.एस.सी.सी. (इंडिया) लिमिटेड, नवी दिल्ली

१२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक

१३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,जळगांव

१४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग ,जळगांव

१५) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव

१६) निवडनस्ती (प्रशा-१)